माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील
३५/१६ एम.एम.फिल्मवरील माहितीपट व
समाचार चित्रांचे डीव्हीसी प्रो व डीव्हीडी
रुपांतरण व पुनरुज्जीवन करण्यास मंजूरी
देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग.
शासन निर्णय क्रमांक. बीयुडी- २०१०/प्र.क्र. २४८ /का.३४.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दि. १६ ऑक्टोबर , २०१०**

प्रस्तावना

महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेपासुन गेल्या पन्नास वर्षामध्ये अनेक माहितीपट /महाराष्ट्र समाचार चित्रांची निर्मिती करण्यात आली. हे माहितीपट गेल्या ५० वर्षांपेक्षा अधिक काळ फिल्मवर संग्रहित असल्याने त्यांच्यापैकी अनेकांच्या पिक्चर निगेटिव्ह, साऊंड निगेटिव्हज व मॅरिड प्रिंटस खराब होत आल्या आहेत. महाराष्ट्राचा हा ऐतिहासिक अनमोल ठेवा भविष्याच्या दृष्टीने जतन करुन ठेवणे आवश्यक आहे. त्यामुळे अशा ३५/१६ एम.एम. फिल्मवरील माहितीपट व समाचार चित्रांचे डीव्हीसी प्रो व डीव्हीडीवर रुपांतरण व पुनरुज्जीवन करावयाचे आहे. सदर काम एकुण १०,००० मिनिटांचे आहे. या कामासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयांने विहीत पध्दतीने निविदा प्रक्रिया पार पाडुन मे. फेमस स्टुडियो लि. मुंबई या यशस्वी निविदाधारका बरोबर दि. २६.०३.२०१० ते दि. २५.०३.२०११ या कालावधीसाठी करार केला आहे. त्यानुसार मे. फेमस स्टुडियो लि. मुंबई यांच्याकडुन ७०० मिनिटांचे काम यापूर्वी करुन घेण्यात आले आहे. त्या आधारे उर्वरित ९३०० मिनिटांचे काम करुन घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. याबाबत शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील ३५/१६ एम.एम. फिल्मवरील माहितीपट व समाचार चित्रांचे डीव्हीसी प्रो व डीव्हीडी रुपांतरण व पुनरुज्जीवन इत्यादी करण्यासाठी उर्वरीत ९३०० मिनिटांच्या कामासाठी येणा-या एकूण रू.१,२४,४५,५००/- (रूपये एक कोटी चोवीस लाख पंचेचाळीस हजार पाचशे फक्त) इतक्या खर्चाच्या योजनेस या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवरील खर्च " मागणी क्र. ए.६ - २२२०, माहिती व प्रसिध्दी, १०९ छयाचित्र सेवा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००)(०१) छयाचित्र सेवा (२२२००४१९)", या शीर्षाखाली वेळोवेळी उपलब्ध होणाऱ्या अनुदानातुन देण्यात येणाऱ्या खर्चाच्या मंजूरीच्या आदेशानंतर भागविण्यात यावा.

३. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१६.५.२००९ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४, नियम क्र.२७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. हा निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra. gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आला असून त्याच्या संगणक संकेताक **२०१०१०१६१६५३३८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( आ.म. लुडबे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), नागपूर
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई.
उप सचिव वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षाअधिकारी, मुंबई.
उप संचालक (लेखा) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
**निवड नस्ती** (का.३४).